**कामगार उप आयुक्त कार्यालय, अमरावती येथील लघुटंकलेखकाचे १ पद सहायक कामगार आयुक्त कार्यालय, भंडारा येथे स्थानांतरित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : इएसटी-२०१९/प्र.क्र.१३४/कामगार-८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक: १३ मार्च, २०२४.

**संदर्भ:-** १. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.संकिर्ण-२०१५/प्र.क्र.४१/अर्थ-१, दि.०२.०६.२०१५.
२. शासन निर्णय समक्रमांक दि.२१.०८.२०१९.
३. उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र.काआआ-२०१३/प्र.क्र.१४७/काम-८, दि.०६.१२.२०२१.
४. कामगार आयुक्त यांचे पत्र क्र.काआ/आस्था/लघुटंकलेखक/स्थानांतर/२०२४/कार्या-२/१३१, दि.०९.०२.२०२४.

**प्रस्तावना:**

कामगार उप आयुक्त कार्यालय, अमरावती येथे कार्यरत असलेल्या लघुटंकलेखकांच्या २ पदांपैकी १ पद सहायक कामगार आयुक्त कार्यालय, भंडारा येथे स्थानांतरित करण्याचा प्रस्ताव कामगार आयुक्त यांनी संदर्भ क्र. ४ येथील दि.०९.०२.२०२४ रोजीच्या पत्रान्वये शासनास सादर केला आहे. त्यानुसार उपरोक्त पद सहायक कामगार आयुक्त कार्यालय, भंडारा येथे स्थानांतरित करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :**

कामगार आयुक्त व त्यांच्या अधिनस्त कार्यालयांच्या आस्थापनेवरील पदांचा सुधारित आकृतीबंध संदर्भ क्र. ३ येथील दि.०६.१२.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेला असून त्यानुसार अमरावती कार्यालयात सद्य:स्थितीत लघुटंकलेखकांची २ पदे कार्यरत आहेत. कामगार आयुक्त यांनी केलेल्या विनंतीनुसार व सहायक कामगार आयुक्त भंडारा कार्यालयाकडील कामाचा व्याप लक्षात घेता, कामगार उप आयुक्त कार्यालय, अमरावती येथील लघुटंकलेखकाचे १ पद सहायक कामगार आयुक्त कार्यालय, भंडारा येथे कायमस्वरुपी स्थानांतरित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भ क्र. १ येथील दि.०२.०६.२०१५ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारांनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०२४०३१३१६३६४८४९१० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SHRINIVAS DATTATRAY JIREWAR

Digitally signed by SHRINIVAS DATTATRAY JIREWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRY ENERGY LABOUR AND MINING DEPARTMENT, 2.5.4.20=42139af095588a908db2916824ef6535970d3af8d589339252ef98696d4e0256, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D151C0F56009AFC3BB3618879DFEE67817426CBEE059F11116E801CAE1B9CF72, cn=SHRINIVAS DATTATRAY JIREWAR
Date: 2024.03.13 16:46:06 +05'30'

**( श्रीनिवास जिरेवार )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रत:-**

१. मा.मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. प्रधान सचिव (कामगार) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई

३. कामगार आयुक्त, कामगार भवन, वांद्रे-कुर्ला संकुल, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०००५१.
४. कामगार उप आयुक्त (प्रशासन), कामगार भवन, वांद्रे (पू), मुंबई-४०००५१.
५. कामगार उप आयुक्त, अमरावती.
६. सहायक कामगार आयुक्त, भंडारा.
७. महालेखापाल, (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती/भंडारा.
९. निवडनस्तीकामगार- ८.